**माध्यमिक व उच्च माध्यमिक प्रमाणपत्र परिक्षेतील पेपर फुटीच्या प्रकारांना आळा घालण्याकरिता उपाययोजना करण्याकरिता समिती गठित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: परीक्षा -२०१७/प्र.क्र.७१/एस.डी.-२**
मादाम कामा रोड,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार,मुंबई-४०० ०३२
दिनांक : १९ मे, २०१७

**प्रस्तावना-**

महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ,पुणे यांच्यामार्फत दरवर्षी माध्यमिक व उच्च माध्यमिक प्रमाणपत्र परीक्षा आयोजित केल्या जातात.या परीक्षा विद्यार्थ्यांच्या जीवनाला दिशा देणा-या परीक्षा आहेत. त्यामुळे या परीक्षांमध्ये होणारे गैरप्रकार हे प्रामाणिक व मेहनती विद्यार्थ्यांच्या मनोबलाचे खच्चीकरण करु शकतात.राष्ट्राच्या उज्ज्वल भवितव्यासाठी व कल्याणकारी राज्याच्या उभारणीसाठी हे निश्चितच भूषणावह नाही.

२. संपूर्ण राज्यासाठी एक नियोजनबद्ध व सर्वघटक समावेशक असा “गैरमार्गाशी लढा” या अभियानाचा कृति-कार्यक्रम गत काही वर्षापासून राज्यमंडळामार्फत संपूर्ण राज्यभर राबविण्यात येत आहे.त्यामुळे परीक्षेशी संबंधित घटकांच्या विशिष्ट वैचारिक मनोवृत्तीमध्ये सकारात्मक बदल होण्यास व परीक्षेतील गैरप्रकार कमी होण्यास मदत झाली आहे.राज्यातील शैक्षणिक गुणवत्ता वाढीसाठी व अधिक जबाबदार भावी पिढी निर्माण व्हावी, याकरिता "कॉपीमुक्त अभियान" सारखे उपक्रम हा एक महत्वाचा टप्पा आहे.

३. राज्यमंडळातर्फे फेब्रुवारी-मार्च २०१७ मध्ये आयोजित करण्यात आलेल्या उच्च माध्यमिक प्रमाणपत्र परिक्षा सुरु होण्यापूर्वी काही मिनिटे अगोदर प्रश्नपत्रिका या समाजमाध्यमावर आल्याच्या घटना घडल्याची बाब निदर्शनास आली आहे.महाराष्ट्राची कर्तुत्ववान भावी पिढी निर्माण करण्यासाठी व परीक्षा पद्धतीवरील सामान्य जनतेचा विश्वास व आदर वृद्धिंगत करण्यासाठी या व अशा इतर गैरप्रकारांना प्रकारांना आळा घालण्यासाठी उपाययोजना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ,पुणे यांच्यामार्फत दरवर्षी आयोजित करण्यात येणा-या माध्यमिक व उच्च माध्यमिक प्रमाणपत्र परीक्षेत घडणा-या गैरप्रकारांना आळा घालण्याकरिता उपाययोजना सुचविण्याकरिता खालीलप्रमाणे समिती गठित करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| I. | आयुक्त (शिक्षण),महाराष्ट्र राज्य,पुणे | अध्यक्ष |
| II. | पोलिस आयुक्त, नवी मुंबई किंवा त्यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| III. | विशेष पोलिस महानिरीक्षक, सायबर कक्ष किंवा त्यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| IV | सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग किंवा त्यांचे परिक्षेचे नियोजन विषयक काम पाहणारे प्रतिनिधी | सदस्य |
| V | शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) | सदस्य |
| VI | सेंट्रल बोर्ड फॉर सेकंडरी एक्जामिनेशन (सी.बी.एस.ई.),दिल्ली यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| VII | आयुक्त,महाराष्ट्र राज्य परिक्षा परिषद, पुणे | सदस्य |
| VIII | अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, पुणे | सदस्य सचिव |

सदर समितीने प्रश्नपत्रिका परीक्षेच्या काही मिनिटे आधी समाजमाध्यमांवर प्रसारित होण्याची कारणे,परीक्षा नियोजनातील त्रूटी,करावयाच्या उपाययोजना,अशा स्वरुपाच्या घटना घडू नयेत तसेच कॉपी प्रतिबंध/परीक्षेतील गैरप्रकार रोखण्यासाठी आवश्यक अधिनियम/नियम इ.बाबत सविस्तर अभ्यास करुन आपला अहवाल शासनास २ महिन्यात सादर करणे आवश्यक राहील.यानुषंगाने आवश्यकतेप्रमाणे तज्ञांना बैठकांकरिता आमंत्रित करण्याचा अधिकार समितीस राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०५१९१५११४७४९२१ असा आहे.हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Suvarna S Kharat

Digitally signed by Suvarna S Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School And Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a98fe3e5a45c818668168cffd366aced9a44c59607f616a36d403a80e74d0df, cn=Suvarna S Kharat
Date: 2017.05.19 15:13:45 +05'30'

**(डॉ.सुवर्णा सि.खरात)**
**सहसचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव,मुख्यमंत्री सचिवालय,मंत्रालय,मुंबई.
२) मा.मंत्री (शालेय शिक्षण) यांचे विशेष कार्य अधिकारी.
३) प्रधान सचिव (शालेय शिक्षण) यांचे स्वीय सहायक.
४) आयुक्त (शिक्षण),महाराष्ट्र राज्य,पुणे.
५) पोलीस आयुक्त,नवी मुंबई किंवा त्यांचे प्रतिनिधी.
६) विशेष पोलीस महानिरिक्षक,सायबर कक्ष किंवा त्यांचे प्रतिनिधी.
७) अध्यक्ष,सेंट्रल बोर्ड ऑफ एक्झामिनेशन,नवी दिल्ली.
८) सचिव,महाराष्ट्र लोकसेवा आयोग.
९) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक),शिक्षण संचालनालय.पुणे.
१०) अध्यक्ष,महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ,पुणे.
११) आयुक्त,महाराष्ट्र राज्य परीक्षा परिषद,पुणे.
१२) निवडनस्ती (एसडी-२)